सार्वजनिक आरोग्य संस्था, नागपूर येथील २
अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- पीएचडी १६०२७/९१/२०२५ पीएचडी (आरोग्य-३) (ई.कॉम्प्युटर नं.१०८५६१४)**
१० व मजला,गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१.
दिनांक:- २८ एप्रिल, २०२५.

वाचा:-

१) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.अपदे-२०२४/प्र.क्र.१०५/आरोग्य-३, दिनांक-२२.१०.२०२४.**
२) **सहसंचालक, आरोग्य सेवा (हिवताप, हत्तीराग व जलजन्यरोग),पुणे यांचे पत्र क्रमांक-संसआसे/आस्था/उपसंआ.से. नागपूर/३ अस्थायी पदे /कक्ष-५२ ब/न.क्र.७२५/३७६१-६३/२५, दिनांक-२६.०३.२०२५.**
३) **वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क., दि. ०३.०३.२०२५.**

**प्रस्तावना:-**

उपरोक्त अ. क्र. १ येथील शासन निर्णयान्वये उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर यांच्या अधिपत्याखालील प्राचार्य, सार्वजनिक आरोग्य संस्था, नागपूर येथील २ अस्थायी पदांना दिनांक ०१.०९.२०२४ ते दिनांक २८.०२.२०२५ पर्यंत देण्यात आलेली मुदतवाढ संपुष्टात आल्याने सदर पदांना पुढे मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

प्राचार्य, सार्वजनिक आरोग्य संस्था, नागपूर येथील (१) कनिष्ठ व्याखाता, वर्ग-२, वेतनश्रेणी एस-२३ व (२) शिपाई, वर्ग-४, वेतनश्रेणी एस-१ या २ अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२५ ते दिनांक ३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०२५-२०२६ या वर्षाकरीता मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक- आर-१**
२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०६ - सार्वजनिक आरोग्य
००३ - प्रशिक्षण
(०१)(०१) - गट वैद्यकीय अधिकारी (२२१० ०४६९)

४. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक, पदनि-२०१६ /प्र.क्र.८ /१६ / आ.पु.क.,दि. ०३.०३.२०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक, पदनि-२०१६ /प्र.क्र.८ /१६ /आ.पु.क., दि.०३.०३.२०२५ अन्वये दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत अस्थाई पदांच्या मुदतवाढीस मान्यता देण्यात आली असली तरी, दरम्यानच्या काळात सुधारीत आकृतीबंधास उच्चस्त्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्याबाबत सर्व प्रशासकीय विभागांनी तातडीने प्रस्ताव सादर करण्याबाबत वित्त विभागाने निर्देशित केले आहे. तसेच उपरोक्त संदर्भ क्र.०३ अन्वये वित्त विभागाच्या शासन निर्णयानुसार, अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली असून त्यादरम्यान सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्याकरीता सुधारीत आकृतीबंधाचे प्रस्ताव शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक २९ जून,२०१७ नुसार तपासून व त्यानुसार कार्यवाही करुन तातडीने वित्त विभागास सादर करण्याकरीता आयुक्तालय कार्यालयाकडून उचित कार्यवाही करावी व त्याबाबातचा प्रस्ताव शासनास पाठवावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४२८११०५५०३९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY DATTARAM MAHADESHWAR

Digitally signed by SANJAY DATTARAM MAHADESHWAR
DN: cn=SANJAY DATTARAM MAHADESHWAR, o, ou, email=sanjay.mahadeshwar@nic.in, c=IN
Date: 2025.04.28 11:35:06 +05'30'

**(सं.द. महाडेश्वर)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक,आरोग्य सेवा, मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा(रुग्णसेवा- राज्यस्तर) मुंबई.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन) पुणे.
६. उपसंचालक, आरोग्य सेवा,नागपूर मंडळ, नागपूर.
७. प्राचार्य, आरोग्य व कुटुंब कल्याण प्रशिक्षण केंद्र, नागपूर.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
९. वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
१०. कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/सेवा-५/अर्थसंकल्प, सा.आ.वि. मंत्रालय,मुंबई.
११. निवडनस्ती (आरोग्य-३)